**खरीप-२०१४ मधील बाधित शेतक-यांना अर्थसहाय्य करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक- एससीवाय-०१/२०११/प्र.क.१/म-११**

**मंत्रालय, मुंबई -४०० ०३२**

**दिनांक :- ७ जानेवारी, २०१५.**

**वाचा:-** **महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्रमांक : सीएलएस -२०१२/प्र.क्र.१५७/म-३, दि. ५ ऑगस्ट, २०१४.**

**प्रस्तावना :-**

राज्याच्या विविध भागात एकुण २३८०२ गावामध्ये वर्ष २०१४ मधील खरीप हंगामामध्ये अपु-या पावसामुळे सर्व प्रकारच्या पिकांचे नुकसान झाले आहे. अवर्षणामुळे बाधित शेतक-यांना मदत जाहीर करण्यात आली आहे.

२. ५० पैशापेक्षा कमी पैसेवारी आलेल्या बाधित गावातील शेतकऱ्यांच्या महसूल नोंदीनुसार जिल्हाधिका-यांकडून प्राप्त मागणीप्रमाणे बाधित शेतकऱ्यांना SDRF च्या मानकानुसार Input Subsidy वाटप करण्याकरिता पुढीलप्रमाणे निधी वाटप करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

१. खरीप २०१४, हंगामामधील बाधित गावातील शेतकऱ्यांना सोबत जोडलेले प्रपत्र-अ नुसार रु.२०००.०० कोटी (अक्षरी रुपये दोन हजार कोटी फक्त) निधीचे वाटप करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदरचा निधी एकुण मागणीच्या सुमारे ४०% असून तो प्रथमत: खर्च झाल्यानंतर उर्वरित निधी वितरीत केला जाईल.

२. शेतक-यांना मदतीचे वाटप करण्याची कार्यवाही क्षेत्रीय स्तरावरील महसूल यंत्रणेमार्फत पार पाडण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यासाठी जिल्हाधिकारी कार्यालयास त्यांचेमार्फत वितरीत मदतीच्या ०.५ टक्के पर्यत प्रशासकीय खर्च देय राहील. यापैकी ०.२५ टक्के प्रशासकीय खर्चासाठी तलाठी यांना उपलब्ध करण्यात यावा. मदतीच्या वाटपासाठी जिल्हाधिकारी यांना इतर विभागाच्या कर्मचाऱ्यांची सेवा अधिग्रहीत करण्याचे अधिकार राहतील .

३. निधीच्या वाटपासंदर्भात सर्वसाधारण मार्गदर्शक सूचना खालीलप्रमाणे राहतील.

(i) ही मदत संबंधित खातेदारांच्या बँक बचत खात्यात थेट जमा करावी. कोणत्याही परिस्थितीत मदत रोखीने अदा करु नये. ज्या शेतकऱ्यांचे बँकेत बचत खाते नसेल त्यांचे जन धन योजनेखाली झिरो बॅलन्स खाते उघडून त्या खात्यामध्ये मदत रक्कम जमा करण्यात यावी.

(ii) मदतीची रक्कम बाधित खातेदारांच्या बँक खात्यावर थेट जमा करताना मदतीच्या रक्कमेतून कोणतीही शासकीय थकबाकीची वसूली करु नये.

(iii) उपरोक्त संदर्भिय शासन निर्णयानुसार प्रत्येक खातेदारास किती रक्कम देय होईल याची बिनचूक यादी बनविण्यात येऊन त्यास उपविभागीय अधिका-यांची मान्यता घेऊनच वाटप करावे. बाधीत शेतक-यांना मदत म्हणून द्यावयाच्या किमान रकमेची मर्यादा राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या निकषानुसार रु.७५०/- एवढी आहे. तथापि किमान मदतीपोटी ठोस रक्कम मिळावी म्हणून सदर रक्कम रु. १०००/- एवढी करण्यात आली आहे.

(iv) मदत योग्य व्यक्तींना, योग्य त्या प्रमाणात मिळेल याची दक्षता घ्यावी. त्यासाठी उदा. पात्र खातेदारांची बिनचूक यादी बनविणे, चावडी/ ग्रामपंचायत/ फलकावर यादी ठळकपणे लावणे, अचानकपणे तपासणी करणे अशा व इतर विविध बाबींचा अवलंब करण्यात यावा.

(v) शेतकऱ्यांकरिता वेगवेगळे धनादेश न काढता बँकनिहाय खातेदारांच्या यादया तयार करुन सर्व खातेदारांकरिता एकत्रित धनादेश बँकेत जमा करावा. बँकामार्फत शेतकरी निहाय मदत त्यांच्या खात्यात तात्काळ जमा होईल याची खात्री करावी.

(vi) **अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध निधी अनावश्यक रीतीने कोषागारात आहरीत करुन तो बँकेत वाटपाअभावी पडून राहणार नाही याची काटेकोर दक्षता घ्यावी.**

(vii) निधी मिळाल्यापासून मदतीचे वाटप खास मोहिम आखून त्वरीत पूर्ण करावे,

(viii) मदतीचे वाटप करण्यासाठी व वेळोवेळी आढावा घेण्यासाठी जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात यावी. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे समितीचे उपाध्यक्ष राहतील. तसेच जिल्हाअधिक्षक कृषि अधिकारी व जिल्हा उपनिबंधक (सहकारी संस्था)हे हया समितीचे सदस्य राहतील. जिल्हाधिकारी कार्यालयातील जिल्हाधिकारी यांनी नेमून दिलेले उपजिल्हाधिकारी हे या समितीचे सदस्य सचिव राहतील. उपरोक्त समितीने या मदत वाटपाचे समन्वय करावे व निधीचे वाटप शेतकऱ्यांच्या बँक खात्यावरच होईल, याची दक्षता घ्यावी. ह्या समितीने जिल्हयातील सर्व बाधित शेतक-यांना मदत वाटप करण्यासाठी वेळापत्रक तयार करावे व त्यानुसार वाटप कार्यात प्रगती होईल याचा दर १५ दिवसांनी आढावा घेऊन खात्री करावी.

४. सन २०१४ च्या नोव्हेंबर-डिसेंबर महिन्यामध्ये गारपीटग्रस्त शेतक-यांना द्यावयाच्या वाढीव रकमेच्या निधीची मागणी विभागीय आयुक्त यांनी स्वतंत्रपणे करावी.

५. सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ नुसार संबधित विभागीय आयुक्तांना जिल्हावार निधीचे वाटप करण्याकरीता एकूण रु.२०००.०० कोटी (अक्षरी रुपये दोन हजार कोटी फक्त) इतक्या निधीचे वाटप करण्यात येत आहे. हा निधी सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात मागणी क्र.सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्ती निवारणार्थ सहाय्य (योजनेत्तर), ०१ अवर्षण, १०१ अनुग्रह सहाय, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानूसार खर्च, (९१) (०५) पीक नुकसानीमुळे शेतकऱ्यांना मदत, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) ,(२२४५ २४३४) या उपलेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहे. या शिर्षाखाली तो अंतीमत: खर्ची दाखवण्यात यावा.

६. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे याची सर्व विभागीय आयुक्त यांनी खातरजमा करावी. निधीच्या वाटपाचे लेखे , अभिलेख / नोंदवहया विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरित व वितरीत करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अदयावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दरमहा होणाऱ्या प्रत्यक्ष खर्चाचे पत्र पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत विभागीय आयुक्त यांनी एकत्रित महसूल व वन विभागास न चुकता सादर करावी. दर तीन महिन्यांनी झालेल्या खर्चाची महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाची पडताळणी करुन त्याबाबतचे प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

७. नियंत्रक अधिकाऱ्यांनी अनुदान वाटपाची एक प्रत सचिव (म व पु) यांना न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार / उपकोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणाऱ्या बिलासोबत जोडल्या जाणाऱ्या संगणक चिठठीमध्ये गौण / उपशिर्षाच्या " संगणक यंत्र " संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश कृपया संबंधित अधिकाऱ्यांना नियंत्रण अधिकाऱ्यांनी दयावेत. तसेच कोषागारातून/ उपकोषागारातून आहरित केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१३/२०१४/व्यय-९, दि.०५/०१/२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०१०८१४५७४७३२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chaaya Kiran Wadte

Digitally signed by Chaaya Kiran Wadte
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Chaaya Kiran Wadte
Date: 2015.01.08 15:07:30 +05'30'

**( छा.कि.वडते )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर,
२) जिल्हाधिकारी, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर
३) जिल्हा कोषागार अधिकारी सर्व (कोकण विभाग वगळून)
४) मा.मंत्री (म व पु) यांचे खाजगी सचिव,
५) मा.राज्यमंत्री (म व पु) यांचे खाजगी सचिव,
६) अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक,
७) अप्पर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहाय्यक,
८) सचिव (म व पु) यांचे स्वीय सहाय्यक,
९) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर (प्रत्येकी ३ प्रती).
१०) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई ४०० ०२३.
११) अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे (पूर्व) , मुंबई -४०० ०५१.
१२) निवासी लेखाधिकारी, मुंबई.
१३) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई (२ प्रती)
१४) वित्त विभाग (अर्थसंकल्प-४/अर्थसंकल्प -६/ व्यय-९/अर्थोपाय कक्ष/वित्त आयोग कक्ष), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१५) कार्यासन अधिकारी (ब-१/म-३/म-७/र-८/पीएसी/पीएसी-१ कार्यासने), म.व व. विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१६) निवडनस्ती , कार्यासन म-११, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

## प्रपत्र-अ
## खरीप २०१४ करीता वितरीत करावयाचे अनुदान

| अ.क्र. | विभाग/जिल्हा | खरीप २०१४ करीता वितरित करावयाचे अनुदान | वितरीत करण्यात येत असलेले अनुदान. **(रु. कोटीत)** |
|---|---|---|---|
| | **नाशिक विभाग** | | |
| १ | नाशिक | ३६२.८० | १५०.८१ |
| २ | धुळे | १७१.६६ | ७१.४९ |
| ३ | नंदुरबार | ६६.९५ | २८.०३ |
| ४ | जळगांव | १८९.०० | ७८.६९ |
| ५ | अहमदनगर | १३८.२० | ५७.६० |
| | **एकुण** | **९२८.६१** | **३८६.६२** |
| | **पुणे विभाग** | | |
| ६ | पुणे | १५.७६ | ६.७९ |
| ७ | सातारा | ०.७१ | ०.७१ |
| | **एकुण** | **१६.४७** | **७.५०** |
| | **औरंगाबाद विभाग** | | |
| ८ | औरंगाबाद | २८८.४१ | ११९.९४ |
| ९ | जालना | २९६.६५ | १२३.३६ |
| १० | बीड | ३४४.६९ | १४३.३० |
| ११ | लातूर | २४४.७६ | १०१.८२ |
| १२ | उस्मानाबाद | १७६.४४ | ७३.४७ |
| १३ | नांदेड | ३१९.५६ | १३२.८७ |
| १४ | परभणी | २२९.१६ | ९५.३५ |
| १५ | हिंगोली | १३२.९९ | ५५.४४ |
| | **एकुण** | **२०३२.६६** | **८४५.५५** |
| | **अमरावती विभाग** | | |
| १६ | बुलढाणा | २८७.९३ | ११९.७४ |
| १७ | अकोला | १८०.२८ | ७५.०७ |
| १८ | वाशिम | १३८.०२ | ५७.५३ |
| १९ | अमरावती | ३०२.५१ | १२५.७९ |
| २० | यवतमाळ | २९५.२९ | १२२.८० |
| | **एकुण** | **१२०४.०३** | **५००.९३** |
| | **नागपूर विभाग** | | |
| २१ | वर्धा | १२८.८९ | ५३.७४ |
| २२ | नागपूर | २६६.२४ | ११०.९४ |
| २३ | भंडारा | १८.९० | ८.०९ |
| २४ | गोंदिया | ०.१९ | ०.१९ |
| २५ | चंद्रपूर | २०४.२३ | ८५.०० |
| २६ | गडचिरोली | २.८७ | १.४४ |
| | **एकुण** | **६२१.३२** | **२५९.४०** |
| | **एकूण सर्व** | **४८०३.०९** | **२०००.००** |